नांदेड येथे नवीन वनभवन इमारतीचे बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र.वनबां-२०२३/प्र.क्र.१२/फ-९**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- ०९ मार्च, २०२३

वाचा :- १) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य,नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष २४/लेखा/प्र.क्र.४६ (२२-२३)/९२५/२०२२-२३, दिनांक ११ जानेवारी, २०२३
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम (भाग-२), दि. २०.०९.२०१९
३) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा-२, दि.२५.०९.२०१९
४) सार्वजनिक बांधकाम विभाग पत्र क्र.बैठक-२०२३/प्र.क्र.१४/इमा-१, दि.०१.०३.२०२३

**प्रस्तावना:-**

नांदेड येथे नवीन वनभवन इमारतीचे बांधकाम करणे या कामाच्या रु.२२६०.३० लक्ष इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत संदर्भ क्र.१ च्या पत्रान्वये विनंती केली आहे.

०२. सदर अंदाजपत्रक उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम (इमारती) उप विभाग, नांदेड यांनी तयार केले असून, कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नांदेड यांनी तपासले आहे. तर अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नांदेड, मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नांदेड व उपमुख्य वनसंरक्षक, नांदेड यांनी स्वाक्षांकित केले आहे.

०३. वित्त विभागाच्या वित्तीय अधिकारामध्ये सुधारणा करण्यासंदर्भात निर्गमित करण्यात आलेल्या संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णय दिनांक २०.०९.२०१९ मधील भाग एक उपविभाग-५ परि.क्र.१३४(१), १३४(२) आणि १३४(३) नुसार तसेच सार्वजनिक बांधकाम विभागाचे संदर्भ क्र.३ दिनांक २५.०९.२०१९ च्या परिपत्रकान्वये स्थापत्य व विद्युत कामाशी संबंधित रु.१५ कोटी किंमती पर्यंतच्या कामांना संबधित मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग यांनी तांत्रीक सहमती दिल्यानंतर प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचे अधिकार संबंधीत उपभोक्ता विभागास देण्यात आलेले आहेत.

०४. सार्वजनिक बांधकाम विभागाने सदर अंदाजपत्रकाची तपासणी केली असता अंदाजपत्रकामध्ये आवश्यकतेनुसार सुधारणा करुन ढोबळमानाने प्रस्तावित केलेल्या तरतूदीनुसार किमतीची परिगणना करण्यात आली असता प्रशासकीय मान्यतेसाठी विषयांकित कामाची किंमत रु.१६.०९ कोटी या

किंमतीस सहमती दर्शविली आहे. तसेच विषयांकित कामाची किंमत रु.१५.०० कोटी पेक्षा जास्त असल्याने संदर्भ क्र.४ अन्वये मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक २४.०२.२०२३ रोजी झालेल्या उच्चाधिकार सचिव समितीच्या बैठकीत नांदेड येथे नवीन वनभवन इमारतीच्या बांधकामाचे रु.१६.०९ कोटी इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास खालीलप्रमाणे उच्चाधिकार सचिव समितीने मान्यता दर्शविली आहे.

१. सदर प्रस्ताव हा नांदेड येथे उपमुख्य वनसंरक्षक यांच्या वन भवन इमारतीच्या बांधकामाबाबतचा आहे.
२. प्रस्तुत इमारत S+G+३ अशी आहे.
३. एकूण क्षेत्रफळ ३४७९.१८ चौ.मी. आहे व बांधकामाचा दर रु.२८,०००/- प्रति चौ.मी.आहे.
४. सदर प्रस्ताव सन २०२२-२३ च्या दरसूचीवर आधारित आहे.
५. सदर कामाचे नकाशे शासकीय वास्तुशास्त्रज्ञाकडून करण्यात आलेले आहे.
६. सविस्तर चर्चेअंती, अंदाजित रु.१६.०९ कोटी इतक्या किंमतीस सहमती दर्शविली आहे.

त्यानुसार नांदेड येथे नवीन वनभवन इमारतीचे बांधकाम करणे या कामाच्या रु.१६.०९ कोटी इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.१ च्या पत्रान्वये सादर केलेला प्रस्ताव व वित्त विभागाचा संदर्भ क्र.२ चा शासन निर्णय व सार्वजनिक बांधकाम विभागाचे संदर्भ क्र.३ चे परिपत्रक विचारात घेता, नांदेड येथे नवीन वनभवन इमारतीच्या बांधकामाचे रु.१६.०९ कोटी इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास उच्चाधिकार सचिव समितीने दिलेल्या सहमतीस अनुसरुन सोबत जोडलेल्या “प्रपत्र-अ” (Recapitulation Sheet) मध्ये नमूद केल्याप्रमाणे तसेच खालील अटींच्या अधीन राहून शासनाची प्रशासकीय मान्यता (वित्तीय मान्यता वगळून) प्रदान करण्यात येत आहे.:-

१. अंदाजपत्रक व नकाशे उपभोक्ता विभागाच्या सक्षम प्राधिकाऱ्याकडून साक्षांकित करुन घेण्यात यावे.
२. काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.
३. प्रस्तुत काम पुरातत्व विभागाच्या अखत्यारित येत असल्यास संबंधीत विभागाची तसेच महानगरपालिका व तत्सम प्राधिकरणे यांची पूर्व परवानगी घ्यावी.
४. तांत्रिक मंजूरी देताना राज्य दरसूचीबाह्य बाबींच्या दराकरीता शासन परिपत्रक क्रमांक-२०१७/प्र.क्र.११/नियोजन-३, दिनांक ११.०४.२०१७ नुसार कार्यवाही करण्यात यावी.

५. प्रस्तावातील खरेदीशी संबंधीत बाबींकरीता ई-निविदा प्रणालीचा अवलंब करुन उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाकडील दि.२४.०८.२०१७ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या सूचना विचारात घ्याव्यात.

६. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

७. स्थापत्य कामाच्या कालावधीतच विद्युतीकरणाबाबत तसेच इतर अनुषंगिक कामांचे योग्य नियोजन करुन सदर कामे पूर्ण करावीत.

८. इमारतीमध्ये दिव्यांगाकरिता उपलब्ध करुन द्यावयाच्या विविध सोयीबाबत शासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांच्या अनुषंगाने कार्यवाही करण्यात यावी.

९. विषयांकित कामाकरिता सुधारित प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही. यादृष्टीने विशेष दक्षता घेऊन काम करण्यात यावे.

१०.सदर कामाच्या बांधकामाचा खर्च योजनेंतर्गत मंजूर उपलब्ध असलेल्या नियतव्ययातून करण्यात यावा.

११.सदरहू कामे करतांना वन (संवर्धन) अधिनियम १९८० अंतर्गत तरतूद तसेच प्रचलित कायदे / नियम संदर्भाधिन तरतूदींचा भंग होणार नाही. तसेच कोणतीही अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी.

१२.वित्त विभागाच्या दिनांक ०४.०४.२०२२ व ०८.०२.२०२३ परिपत्रकातील अटींची पूर्तता होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

१३.शासन निर्णय क्रमांक एमएससी- २०११/प्र.क्र. १७८/फ-५, दिनांक ३०.९.२०११ च्या परिशिष्टात नमुद केलेल्या अटी व शर्ती बंधनकारक असतील.

सदर शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम(भाग-२), दिनांक २०.०९.२०१९ अन्वये वित्तीय अधिकारामध्ये सुधारणा करण्यासंदर्भातील शासन निर्णयातील भाग एक उपविभाग-५ परि.क्र.१३४(१), १३४(२) आणि १३४(३) नुसार तसेच सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा-२, दिनांक २५.०९.२०१९ अन्वये स्थापत्य व विद्युत कामाशी संबंधित रु.१५ कोटी किंमती पर्यंतच्या कामांना संबधित मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग यांनी तांत्रीक सहमती दिल्यानंतर प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचे उपभोक्ता विभागास प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकारानुसार, सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या सहमतीने, उच्चाधिकार सचिव समितीच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३०९१८३७२९०३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

PINGALE BHANUDAS NARAYAN

Digitally signed by PINGALE BHANUDAS NARAYAN
DN: CN = PINGALE BHANUDAS NARAYAN, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST DEPARTMENT
Date: 2023.03.09 18:47:46 +05'30'

**( भा. ना. पिंगळे )**
**उप सचिव (वने)**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) औरंगाबाद.
४. उपवनसंरक्षक (प्रादेशिक) नांदेड.
५. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
६. सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन, मंत्रालय, मुंबई.
८. नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई.
९. कार्यासन फ-२/ब-१ , महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती).

शासन निर्णय क्रमांक:-वनबां-२०२३/प्र.क्र.१२/फ-९, दिनांक- ०९ मार्च, २०२३ सोबतचे विवरणपत्र

## "प्रपत्र-अ"

**Name of the Department : Revenue and Forest Department**

**Name of Work : Construction of Divisional Office Van Bhavan for Deputy Conservator of Forest at Nanded**

**RECAPITULATION SHEET**

| Sr. No. | Particulars of Scope | Unit Rate Norms Rs/(Sqmt./M) / LS | | Cost Rs. | |
|---|---|---|---|---|---|
| | | Units | Rate | Component Wise | Total |
| (A) | **ESSENTIAL ITEMS (Components)** | | | | |
| 1 | (a) Building proper (Built Up Area - Sq.m) | | | | |
| | Stilt Floor | 505.44 | 16,000 | 80,87,040 | |
| | Ground Floor | 380.45 | 28,000 | 1,06,52,600 | |
| | 1st floor | 877.09 | 28,000 | 2,45,58,520 | |
| | 2nd floor | 858.10 | 28,000 | 2,40,26,800 | |
| | 3rd floor | 858.10 | 28,000 | 2,40,26,800 | |
| | **Sub Total (a)** | 3,479.18 | | | 9,13,51,760 |
| | Rain/ Roof Water Harvesting | | L.S. | 5,00,000 | |
| | Furniture | 2,081.62 | 5,000 | 1,04,08,100 | |
| | | | | **Sub Total (1)** | 1,09,08,100 |
| 2 | Water Supply & Sanitary Works | | 5% of (a) | | 45,67,588 |
| 3 | Electrification Internal | | 5% of (a) | 45,67,588 | |
| | External | | 6% of (a) | 54,81,106 | |
| | Fire Fighting Arrangements etc. | | L.S. | 5,00,000 | |
| | | | | Sub Total (3) | 1,05,48,694 |
| | | | **Sub Total (A)** | | 11,73,76,142 |
| (B) | **MISCELLANEOUS ITEMS** | | | | |
| | Compound Wall & Gate (Rmt) | 100 | 8,000 | 8,00,000 | |
| | Internal Roads (Rmt) | | L.S. | 10,00,000 | |
| | Development of Ground | | L.S. | 2,00,000 | |
| | Land Scaping | | L.S. | 5,00,000 | |
| | Soil Investigations & Detail Land Survey | | L.S. | 1,00,000 | |
| | CC Drains and C/D Works | | L.S. | 5,00,000 | |
| | | | | **Sub Total (B)** | 31,00,000 |
| | | | **Sub Total** | **(A+B)** | 12,04,76,142 |
| (C) | **OPTIONAL ITEMS** | | | | |
| | Undergound Water Tank and pump house | | L.S. | 10,00,000 | |
| | Water Main Storage | | L.S. | 5,00,000 | |
| | Lifts | | L.S. | 50,00,000 | |
| | AB Room, Area Lighting, Pump, Generator | | L.S. | 2,00,000 | |
| | CCTv | | L.S. | 2,00,000 | |
| | | | | Sub Total (C) | 69,00,000 |
| | | | **Project Cost (P)** | **= (A) + (B) + (C)** | 12,73,76,142 |
| (D) | **PROVISIONS** | | | | |
| | (i) Contingencies 4% on (a) | | | 36,54,070 | |
| | (ii) Labour Insurance 0.5% on (P) | | | 6,36,881 | |
| | (iii) GST 18% on (P) | | | 2,29,27,705 | |
| | (iv) Price escalation 5% on (P) | | | 63,68,807 | |
| | | | **Sub Total (D)** | | 3,35,87,464 |
| | **TOTAL COST OF PROJECT (TPC)** | | | **(A+B+C+D)** | 16,09,63,605 |
| | | | **Say Rs. Lakhs** | | 1609.64 |

**PLINTH AREA RATES FOR**

(i) Bldg Proper Cost `= Rs 26,256.69 /Sqm

(ii) Elect. Work `= Rs 3032 /Sqm

(iii) Water Supply `= Rs 1,313 /Sqm

(iv) For (i) + (ii) + (iii) `= Rs 30601 /Sqm

PINGALE BHANUDAS NARAYAN

Digitally signed by PINGALE BHANUDAS NARAYAN
DN: CN = PINGALE BHANUDAS NARAYAN, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST DEPARTMENT
Date: 2023.03.09 18:48:11 +05'30'

( भा. ना. पिंगळे )
उप सचिव (वने)
महसूल व वन विभाग

*D:\Office Work\२०२३\Construction Buildings\CR_ १२_ २०२३_Ad_Nanded.Docx*